उप संचालक, आरोग्य सेवा,पुणे मंडळ यांच्या अधिपत्याखालील उपजिल्हा रुग्णालय, मंचर, जि.पुणे येथील ७४ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः अपदे २०१८/प्र.क्र.१४७/आरोग्य-३ अ

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी.रुग्णालय आवार, मुंबई ४०० ००१
तारीख: ३१ ऑक्टोबर, २०१८

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांकः सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे २०१८/प्र.क्र.१४७/आरोग्य-३ अ, दि.१३ एप्रिल,२०१८
२) सहसंचालक,आरोग्य सेवा (रुग्णालये) राज्यस्तर,मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/कक्ष-३/टे-१२ /१०७८०/१८ दि.१०/१०/२०१८
३) शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क दि.७/९/२०१८

## शासन निर्णय-

संदर्भाधिन क्र.१ येथील शासननिर्णय क्र.अपदे २०१८/प्र.क्र.१४७/ आरोग्य-३अ, दि.१३/४/२०१८ अन्वये उप संचालक, आरोग्य सेवा,पुणे मंडळ यांच्या अधिपत्याखालील उपजिल्हा रुग्णालय ,मंचर,जि.पुणे येथील ७४ अस्थायी पदे चालू ठेवण्यास दि.१/३/२०१८ ते दि.३०/९/२०१८ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली होती.

२. संदर्भाधीन क्र.२ येथील प्रस्तावास अनुसरुन सदर पदांना दि.१/१०/२०१८ ते दि.२८/२/२०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर ७४ अस्थायी पदाना शासन निर्णय वित्त विभाग क्र पदनि-२०१६/ प्र.क्र.८/१६/आ.पु.क दि.७/९/२०१८ मधील अटीच्या अधीन राहून दिनांक १/१०/२०१८ ते दिनांक २८/२/२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खाली दर्शविण्यात आलेल्या लेखाशिर्षातून खर्ची टाकण्यात यावा आणि हा खर्च सन २०१८-१९ या वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागवण्यात यावा..

मागणी क्रमांक आर-१

**२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,**
**०१ नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा,**
**११०-रुग्णालये व दवाखाने,**
**११०-७ पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना,**
**(०६)(०१)-मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने,(२२१० ०२२६).**

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दिनांक ७ सप्टेंबर, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०३११७४८५१८०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shamraoji Kaurte

Digitally signed by Rajendra Shamraoji Kaurte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50aba9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, serialNumber=7caa550613a8c4cb7c593368fa a24e20d6f8985f510118e6fc1af8b04a443ee8, cn=Rajendra Shamraoji Kaurte
Date: 2018.11.01 17:50:59 +05'30'

**(रा.शा.कौरते)**
(अवर सचिव, महाराष्ट्र शासन)

प्रत,

१) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व लेखापरिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय ग्रामीण अभियान, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
४) सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालय- राज्यस्तर), मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), मुंबई
६) उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, जि-पुणे
७) जिल्हा शल्य चिकीत्सक, जिल्हा रुग्णालय, पुणे
८) वैद्यकिय अधिक्षक, मंचर सामान्य रुग्णालय, मंचर ता-आंबेगाव, जि-पुणे
९) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
११) वित्त विभाग (व्यय १३)/वित्तीय सुधारणा-१/आपुक/, मंत्रालय, मुंबई
१२) अवर सचिव/कक्ष अधिकारी (सेवा-२, सेवा-३, सेवा-५, अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

निवडनस्ती(आरोग्य-३अ)